# *** श्री रामाचा पाळणा ***

पहिल्या दिवशी वदली गंगा
नका बायांनो करू हो दंगा
दशरथ राजाला जाउनी सांगा
जो बाळा जो जो रे जो || **०१** ||

दुसऱ्या दिवशी बोलली भागा
बायांनो तुम्ही चरणाशी लागा
दान चुड्याचे रामाला मागा
जो बाळा जो जो रे जो || **०२** ||

तिसऱ्या दिवशी वदली उमा
बाळाच्या रूपाची लागे ना सीमा
ऐसी बोलली महादेव भीमा
जो बाळा जो जो रे जो || **०३** ||

चवथ्या दिवशी बोलली तारा
आला सोनार आपुल्या घरा
बाण धनुष्य रामाला करा
जो बाळा जो जो रे जो || **०४** ||

पाचव्या दिवशी सखी वदली
सीता रामाची रावणाने नेली
मारुती रायने लंका जाळली
जो बाळा जो जो रे जो || **०५** ||

सहाव्या दिवशी जना बोलली
लक्ष्मणाला शक्ती लागली
पहाड आणाया गेला मारुती
जो बाळा जो जो रे जो || **०६** ||

सातव्या दिवशी साती कल्लोळ
राम जन्मला रूप सावळ
राम निघाला रावणाचा काळ
जो बाळा जो जो रे जो || **०७** ||

आठव्या दिवशी बोलली लीला
दशरथ राजाला पुत्र हो झाला
कौसल्या मातेने झोका हा दिला
जो बाळा जो जो रे जो || **०८** ||

नवव्या दिवशी नवल बाळाचे
जशी खुलली कळी कमळाची
प्रसूत झाली त्या वेळेशी
जो बाळा जो जो रे जो || **०९** ||

दहाव्या दिवशी बोलला गजा
संगे घेऊन वानर फौजा
विभीषणा केला लंकेचा राजा
जो बाळा जो जो रे जो || **१०** ||

अकराव्या दिवशी अकरा बारंत
ब्रम्हा विष्णूला लागला छंद
पाची हत्यारे रामाच्या संग
जो बाळा जो जो रे जो || **११** ||

बाराव्या दिवशी कहाणी सारी
बीजली बत्तीचा प्रकाश भारी
तेहतीस कोटी देव जमले दरबारी
जो बाळा जो जो रे जो || **१२** ||

तेराव्या दिवशी धनुष्य टाकिले
लक्ष्मण अवतार शोधिले
यातून एक युग लोटले
जो बाळा जो जो रे जो || **१३** ||

चवदाव्या दिवशी नंदीवर बसले
देशोदेशी वानर धाडिले
रामाने मारुतीला स्वराज्य दिले
जो बाळा जो जो रे जो || **१४** ||

पंधराव्या दिवशी अवतार बदले
कृष्ण पांडव पुढे निघाले
कंस मामला त्यानी वधिले
जो बाळा जो जो रे जो || **१५** ||

सोळाव्या दिवशी सोळावा केला
गुरु वसिष्ठ विद्या बोलला
धन्य रामाचा पाळणा गाईला
जो बाळा जो जो रे जो || **१६** ||